**वर्धा येथील जिल्हा पातळीवरील बंदिस्त नाट्यगृहाच्या जागेत बदल करण्यास मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : नागृबा २०१२ /प्र.क्र.१६४ /सां.का.१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार इमारत, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ३० जानेवारी, २०१९.

वाचा : १) शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, क्र.नागृबा-२०१५/प्र.क्र.८५/सां.का.१, दि.२९.०२.२०१६.
२) शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, क्र.नागृबा-२०१२/प्र.क्र.१६४/सां.का.१, दि.१६.०२.२०१८.
३) जिल्हाधिकारी, वर्धा यांचे पत्र क्र.कक्ष-एल/सांस/नाट्यगृह/१७०/२०१८, दि.०७.१२.२०१८.

**प्रस्तावना :**

जिल्हा पातळीवर बंदिस्त नाट्यगृह बांधण्याच्या उपर्निर्दिष्ट दि.२९.०२.२०१६ च्या शासन निर्णयातील सुधारीत योजनेनुसार, वर्धा जिल्हा मुख्यालयात नगरपालिकेच्या जागेत बंदिस्त नाट्यगृह बांधण्याचा रु.२४,६८,३१,९९२/- खर्चाच्या अंदाजपत्रकास एक विशेष बाब म्हणून शासनाने प्रशासकीय मान्यता दिली आहे. तथापि, नगरपरिषद, वर्धा कार्यालयाकडून सदरहू जागा नाट्यगृह उभारणीस उपलब्ध करुन देण्यास विलंब होत आहे. त्यामुळे लोकप्रतिनिधी व कलाप्रेमी यांनी जिल्हा परिषद, वर्धा यांच्या मालकीच्या वर्धा शहरातील महात्मा गांधी विद्यालयाच्या जागेवर नवीन नाट्यगृह उभारणीची विनंती केली आहे. त्यानुसार प्रस्तावित बंदिस्त नाट्यगृह उभारणीस जिल्हा परिषदेने सदर नाट्यगृह इमारतीचा मालकी हक्क जिल्हा परिषदेचा राहील, या अटीवर वर्धा शहरातील महात्मा गांधी विद्यालयाची जागा या प्रयोजनासाठी देण्यास मान्यता दिली आहे. त्यामुळे उपर्निर्दिष्ट क्र.३ येथील जिल्हाधिकारी, वर्धा यांच्या प्रस्तावानुसार विचाराधीन बंदिस्त नाट्यगृहाच्या जागेत बदल करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. या संदर्भात शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :**

**१)** महात्मा गांधी विद्यालय, वर्धा या जिल्हा परिषदेच्या जागेवर उपर्निर्दिष्ट क्र.१ येथील शासन निर्णयातील तरतूदीनुसार बंदिस्त नाट्यगृह उभारणीस शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

**२)** उपर्निर्दिष्ट क्र.१ येथील शासन निर्णयातील योजनेंतर्गत बांधण्यात येणाऱ्या बंदिस्त नाट्यगृहाच्या इमारतीवर व इतर सर्व सामग्रीवर शासनाचा प्राथम्याने हक्क राहील व शासकीय कार्यक्रमांसाठी प्राथम्याने आरक्षण राहील.

०२. या शासन निर्णयाच्या परिणामी नगरपरिषद, वर्धा यांच्या मालकीच्या जागेवर बंदिस्त नाट्यगृह उभारण्यास उपर्निर्दिष्ट क्र.२ येथील शासन निर्णयान्वये प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता रद्द करण्यात येत आहे. जिल्हाधिकारी, वर्धा यांनी महात्मा गांधी विद्यालय, वर्धा या जिल्हा परिषदेच्या मालकीच्या जागेवर उभारावयाच्या बंदिस्त नाट्यगृहाचे अंदाजपत्रक व आराखडा, सार्वजनिक बांधकाम विभागाचे संबंधित मुख्य अभियंता व अधिक्षक अभियंता तसेच उपभोक्ता विभागाचे सक्षम प्राधिकारी यांच्याकडून साक्षांकित करुन शासनास सादर करावा. विचाराधीन जागेच्या मालकी हक्क व आरक्षणाबाबतची खातरजमा जिल्हाधिकारी, वर्धा यांनी करुन घ्यावी.

०३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०१९०१३०११०७२२८४२३ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Shailesh Tukaram Jadhav

Digitally signed by Shailesh Tukaram Jadhav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tourism And Cultural Affairs Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2f28af075ed91b64d12528e9ab00bb144f43fcf33c23ccf14c820b969f8ca273, serialNumber=a90555ec4a073187eb44ee0b1aa93e5c855afff34eedb4b03bb3e0a6cfd6271c, cn=Shailesh Tukaram Jadhav
Date: 2019.01.31 10:58:20 +05'30'

**( शैलेश तु. जाधव )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.मंत्री, सांस्कृतिक कार्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा.मंत्री, वित्त व नियोजन यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) प्रधान सचिव, (सांस्कृतिक कार्य), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) जिल्हाधिकारी, जिल्हा-वर्धा.
८) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, वर्धा.
९) मुख्याधिकारी, वर्धा नगरपरिषद, जिल्हा-वर्धा.
१०) निवड नस्ती, सां.का.१